जल जीवन मिशन कार्यक्रमांतर्गत जयगड प्रादेशिक, ता. जि. रत्नागिरी पाणी पुरवठा योजनेच्या सुधारित अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
शासन निर्णय **क्रमांकः जजीमि- २०२१/प्र.क्र. २२८ /पापु-१३**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२**
**तारीखः १६ फेब्रुवारी, २०२२.**

**वाचा**

१) शासन निर्णय क्रमांक: ग्रापापु-१३१८/प्र.क्र. २२१ /पापु-०६, दिनांक ०७ जानेवारी, २०१८
२) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे यांचे तांत्रिक मान्यता आदेश क्र. मजीप्रा/मु.अ.(ठाणे)/तांशा-२/ जयगड प्रादे. पा.पु. यो.२७०, दि.०७.०२.२०१९
३) निविदा समितीच्या १३७ व्या बैठक दि. १७.११.२०२१ रोजीचे इतिवृत्त
४) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांचे पत्र क्र. मजीप्रा/सस/तांशा-३/१४४६/२०२१ दि. ०६.१२.२०२१
५) विभागाचे पत्र समक्रमांक क्र. जजीमि- २०२१/प्र.क्र. २२८ /पापु-१३ दि.,१०.०१.२०२२
६) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे यांचे सुधारित तांत्रिक मान्यता आदेश क्र. मजीप्रा/मु.अ. (ठाणे)/जयगड नप पापुयो/ तांशा-२/१५२, दि.२७.०१.२०२२
७) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांचे पत्र क्र. मजीप्रा/सस/तांशा-३/१७२/२०२२, दि.०४.०२.२०२२

**प्रस्तावना**

जयगड (ता. जि. रत्नागिरी ) प्रादेशिक पाणी पुरवठा योजनेच्यारु.३२,०२,६७,५००/- इतक्या ढोबळ किंमतीच्या अंदाजपत्रकास राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत विभागाच्या शासन निर्णय क्र.ग्रापापु १३१८/प्र.क्र.२२१/पापु-०६, दि.०७.०१.२०१९ अन्वये मूळ प्रशासकीय मान्यता प्रदान केली आहे. सदर योजनेच्या अंदाजपत्रकास मुख्य अभियंता, मजीप्रा, ठाणे यांनी दि.०७.०२.२०१९अन्वये तांत्रिक मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. सदर योजनेंतर्गत कामाकरीता जादा दराची निविदा प्राप्त झाल्याने निविदा समितीच्या दि.१७.११.२०२१ रोजीच्या बैठकीतील निर्णयानुसार योजनेची भागश: प्रशासकीय मान्यता रद्द करण्याबाबत सदस्य सचिव यांनी संदर्भ क्र. ४ अन्वये विनंती केली होती. तथापि, योजनेच्या कामात तांत्रिक बदल अथवा योजनेच्या किंमतीत बदल होत असल्यास योजनेच्या सुधारित प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव सादर करणेबाबत संदर्भ क्र.५ अन्वये कळविण्यात आले. त्यानुसार योजनेच्या यांत्रिकी कामांची अद्याप निविदा प्रक्रिया झाली नसल्याने सदर कामांचे अंदाजपत्रक दरसूची सन २०२१-२२ नुसार करून तसेच कळझोंडी धरण व त्यानुषंगिक कामे यांचे अंदाजपत्रके दरसूची सन २०२१-२२ नुसार केल्याने मूळ अंदाजपत्रकीय किंमतीमध्ये वाढ झाल्याने मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे यांनी प्रस्तुत योजनेमधील तांत्रिक बदलासह सुधारित अंदाजपत्रकास दि.२७.०१.२०२२ रोजी सुधारित तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. त्यानुसार सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांनी प्रस्तुत नळ पाणी पुरवठा योजनेच्या तांत्रिक बदलासह सुधारित आराखड्यास व अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव

संदर्भाधिन पत्र क्र.७ अन्वये शासनास सादर केला होता. तद्अनुषंगाने प्रस्तुत योजनेच्या सुधारित आराखड्यास व अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

जयगड प्रादेशिक( ता. जि. रत्नागिरी) पाणी पुरवठा योजनेच्या तांत्रिक बदलासह रु. ३३,८३,०१,२६६/- (ढोबळ) ( अक्षरी तेहतीस कोटी त्र्याऐंशी लाख एक हजार दोनशे सहासष्ट फक्त ) एवढ्या सुधारित किमतीच्या अंदाजपत्रकास जल जीवन मिशन कार्यकमातंर्गत पुढील अटींच्या अधिन राहून सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**अटी:-**

१. उपरोक्त नमुद सुधारित किंमतीत उर्वरित सर्व कामे विहित कालमर्यादेत पूर्ण करावीत.
२. या योजनेस सहमती दिलेल्या मूळ प्रशासकीय मान्यतेच्या तसेच सुधारीत तांत्रिक मान्यता देतांना नमुद केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.
३. ही योजना पूर्ण झाल्यावर ती संबंधित शिखर समितीच्या ताब्यात देण्यात यावी. संबंधित कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,ठाणे/ रत्नागिरी यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे, या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यास संबंधीत शिखर समिती/जिल्हा परिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद/महाराष्ट्र जीवन प्राधिकरण व संबंधित ग्रामपंचायतचे अधिकारी यांनी योजनेची संयुक्तपणे पाहणी आयोजित करावी आणि अशा पाहणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.
४. ही योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) या साठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/ जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही.
५. सदर योजना पुर्ण झाल्यावर स्थानिक स्वराज्य संस्थेने ( संबधित ग्रामपंचायत/ जिल्हा परिषद) योजना हंस्तातरित करुन घेणे बंधनकारक राहील. तसेच योजनेचे लेखे बंद करण्यात यावेत.
६. १०० टक्के कार्यात्मक नळ जोडणीबाबत आवश्यक ते नियोजन ग्रामपंचायतीकडून करण्यात यावे.
**७.** जल जीवन मिशनच्या दृष्टीने आतापर्यंत दिलेल्या नळ जोडणीची नोंद तपासणे व यापूढे देण्यात येणाऱ्या नळ जोडणीबाबत IMIS वर माहिती वेळेत नोंदविणे आवश्यक आहे.
८. जल जीवन मिशनांतगर्त देण्यात आलेल्या मार्गदर्शक सूचनांची काटेकोर अंमलबजावणी करण्याची दक्षता घेण्यात यावी.

९. सन २०१३ मधील CAG च्या अहवालानुसार राज्यातील २१% पाणी पुरवठा योजना या देखाभाल दुरुस्ती अभावी, वीज देयक न भरल्यामुळे ( Poor maintenance/nonpayment of electricity of bills) बंद पडल्या असल्याचे दिसून येते. यास्तव सदर योजना आर्थिकदृष्ट्या सक्षम राहण्याच्या दृष्टीने पाणीपट्टी दरामध्ये आवश्यकतेनुसार वाढ करण्याची जबाबदारी संबधित ग्रामपंचायत/जिल्हा परिषद यांची राहील.

१०.हगणदारीबाबतच्या प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

११.प्रस्तुत योजना कोणत्याही परिस्थितीत पुनर्सुधारीत केली जाणार नाही याची जबाबदारी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची राहील.

१२. सुधारित अंदाजपत्रकास मान्यता असल्याबाबतचा तसेच योजनेचा देखभाल दुरुस्तीचा खर्च भागविण्याकरिता नळ पाणी पट्टीमध्ये कालपरत्वे वाढ करण्यासाठीचा ठराव संबंधित ग्रामपंचायतीकडून घेण्यात यावा.

०२. या योजनेच्या सुधारित किमंतीतील वाढीव खर्च रु. १,८०,३३,७७७/- (अक्षरी एक कोटी ऐंशी लाख तेहतीस हजार सातशे सत्याहत्तर फक्त ) हा मागणी क्र. वाय-०२, जिल्हा परिषद योजनांतर्गत अनुदाने (०२) (१५) नळाद्वारे पाणी पुरवठा योजना राष्ट्रीय ग्रामीण पयेजल कार्यक्रम यासाठी अनुदान (केंपुयो-राज्य हिस्सा) (कार्यक्रम)३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) लेखाशीर्ष (२२१५ २०७१) या लेखाशिर्षाखालील मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

०३. या योजनेस सुधारित प्रशासकीय मान्यता ही वित्त विभाग शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५ मधील भाग पहिला, उपविभाग-३, अ.क्र. ६, परिच्छेद क्र.२७ (अ) अनुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार देण्यात येत आहे.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२१७१००३५०४१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RANI DEELIPRAO DEOKATE

Digitally signed by RANI DEELIPRAO DEOKATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=b0869a90562f87b9afb32e69166c729b50fd795952e7aeb9091b613d5a868aa7, pseudonym=EBDDE6E6DC46959920B4201DA4C1EADA80A905B3, serialNumber=BBD64806F9A7A26899A43E3A95A0566B762C44B895D6316615D2932D87DEFEEE,
cn=RANI DEELIPRAO DEOKATE
Date: 2022.02.21 10:44:20 +05'30'

( राणी दि. देवकत्ते)
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री, (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/ विधानपरिषद
४. मा. विधानमंडळ सदस्य (सर्व)

५. महालेखापाल,महाराष्ट्र-१,मुंबई (लेखापरिक्षा व अनुज्ञेयता).
६. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर (लेखापरिक्षा व अनुज्ञेयता).
७. विभागीय आयुक्त, कोकण विभाग,
८. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
९. जिल्हाधिकारी, रत्नागिरी
१०.संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
११.मिशन संचालक, राज्य पाणी व स्वच्छता समिती,सिडको भवन,बेलापूर, नवी मुंबई
१२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी
१३.मुख्य अभियंता ,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण ठाणे
१४.कार्यकारी अभियंता ,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण ठाणे / रत्नागिरी
१५. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१६. मुख्य अभियंता तथा वि.का.अ.पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुबई.
१७. निवडनस्ती पापु-१३, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.